**मंत्रालय उपाहारगृह व विधानभवन उपाहारगृहामार्फत पिण्याच्या पाण्याच्या सिलबंद बाटल्या उपलब्ध करुन देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग (उपाहारगृहे)**
**शासन परिपत्रक क्रमांक : संकीर्ण २०१८/प्र.क्र.२६६/मंउका**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ०५ नोव्हेंबर, २०१८

**शासन परिपत्रक-**

सामान्य प्रशासन विभागाच्या अधिपत्याखालील मंत्रालय उपाहारगृह, विधान भवन उपाहारगृह, कोकण भवन उपाहारगृह, व चौरस आहारगृह चालविण्यात येत असून मंत्रालय उपाहारगृहामार्फत मंत्रीमंडळ बैठक, मा. मुख्यमंत्री कार्यालय, मा. मंत्री कार्यालये, सचिव व त्यावरील वरिष्ठ अधिकारी यांचेकडे होणाऱ्या बैठकांसाठी खान-पान सेवा पुरविण्यात येत असते. तसेच विधानभवन उपाहारगृहामार्फत मा. सभापती महोदय, मा. अध्यक्ष महोदय यांचेकडील बैठका, अधिवेशन कालावधीत होणाऱ्या मंत्रीमंडळ बैठका, मा. मंत्री महोदयांकडील बैठका, तसेच विधान मंडळ सचिवालयातील समित्या तथा वरिष्ठ अधिकारी यांना खान-पान सेवा पुरविण्यात येते. मंत्रालय उपाहारगृह व विधान भवन उपाहारगृह यांचेमार्फत सेवा देत असताना उपरोक्त प्रमाणे होणाऱ्या बैठकांसाठी तसेच मा. मुख्यमंत्री, मा. मंत्री तथा प्रशासकीय विभागाचे वरिष्ठ अधिकारी यांचेकडील बैठकांसाठी उपाहारगृहामार्फत बिसलेरी पिण्याच्या पाण्याच्या सिलबंद बॉटल्स उपलब्ध करुन देण्यात येत होत्या.

२. पर्यावरण विभागाने महाराष्ट्र अविघटनशील कचरा (नियंत्रण) कायदा-२००६ अंतर्गत दि.२३.०३.२०१८ रोजी "महाराष्ट्र प्लास्टीक व थर्माकोल अविघटनशील वस्तूंचे (उत्पादन, वापर, विक्री, वाहतूक, हाताळणी, साठवणूक) अधिसुचना २०१८" प्रसिध्द केली असून दिनांक ११/४/२०१८ व दिनांक ३०/६/२०१८ च्या अधिसूचनेन्वये सुधारणा केलेल्या आहेत.

३. पर्यावरण विभागाने दि.३०.०६.२०१८ च्या अधिसूचनेत परि. २ (ड) मध्ये "२०० मिलीपेक्षा कमी द्रव धारण क्षमता असलेल्या पिण्याच्या पाण्याच्या पीईटी व पीईटीई बाटल्यांचे उत्पादन, खरेदी, विक्री, वितरण, साठवणूक व वापरावर संपूर्ण राज्यात बंदी असेल" अशी तरतूद विहित केलेली आहे. त्यानुषंगाने मंत्रालय उपाहारगृहामार्फत मंत्रालय तथा विधानभवन येथे होणाऱ्या बैठकांसाठी पिण्याच्या पाण्याच्या बॉटल्स पुरविण्यास मान्यता देण्याचा प्रस्ताव पर्यावरण विभागास प्रस्ताव सादर केला असता, २०० मि.ली. पेक्षा जास्त द्रवधारण क्षमता असलेल्या वापरलेल्या प्लास्टीक बॉटल्स गोळा करण्याकरीता कार्यालयाने स्वतंत्र जागा ठेऊन त्याची उत्पादकांच्या माध्यमातून पुर्नचक्रीकरणाद्वारे विल्हेवाट लावणे संबंधितावर बंधनकारक राहील", या अटींच्या अधीन राहून पर्यावरण विभागाने प्रस्तावास सहमती दिली आहे.

४. मंत्रालय इमारत आवारात वापरलेल्या प्लॅस्टीक बॉटल्सवर प्रक्रीया करुन त्या नष्ट करण्याकरीता मंत्रालय विस्तार इमारतीच्या पुर्वेकडील आरसा प्रवेशद्वाराजवळ पर्यावरण विभागामार्फत मशिन बसविण्यात आलेली आहे.

५. पर्यावरण विभागाने दिलेल्या मान्यतेनुसार मंत्रीमंडळ बैठका तसेच मा. मुख्यमंत्री, मा.मंत्री व सचिव व त्यांचे स्तरावरील अधिकारी यांचेकडे होणाऱ्या बैठकांसाठी त्या-त्या कार्यालयाने नोंदविलेल्या मागणीनुसार त्यांना उपलब्ध करुन देण्यात येणाऱ्या पिण्याच्या पाण्याच्या बॉटल्सचा वापरानंतर त्या-त्या संबंधित कार्यालयाने नष्ट करणे बंधनकारक राहील, या अटीच्या अधिन राहून उपाहारगृहामार्फत२०० मिलीपेक्षा जास्त द्रव धारण क्षमता पिण्याच्या पाण्याच्या बॉटल्स उपलब्ध करुन देण्यात येतील.

६. हे परिपत्रक पर्यावरण विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक४७/तां.क.१, दिनांक १४/९/२०१८ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१८११०५१७४२४४०४०७ असा आहे. सदर परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षंकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Imtiyaz Mushtaque Kazi

Digitally signed by Imtiyaz Mushtaque Kazi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=711589caceff9b0bb07e3c6556e724501d0c5ea5c63b3146314d51ec0e87d0a6, serialNumber=77a529748c5e7c1ba7a66e81c654ba3c492fda5b29e076241db1ba213ddedf4e, cn=Imtiyaz Mushtaque Kazi
Date: 2018.11.05 17:46:20 +05'30'

**( इ.मु.काझी )**
**सह सचिव (उपाहारगृहे)**
**महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्र्याचे अपर मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
२) मा.सभापती, विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई
३) मा.अध्यक्ष, विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई
४) मा.उपसभापती, विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई
५) मा.उपाध्यक्ष, विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई
६) मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई
७) मा.विरोधी पक्षनेतर, विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई
८) मा.मंत्री आणि राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
९) मुख्य सचिव, यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१०) प्रधान सचिव, यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
११) अपर मुख्य सचिव (सेवा) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक

१२) सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालयीन विभाग यांचे स्वीय सहायक

१३) वरिष्ठ व्यवस्थापक, मंत्रालय उपाहारगृहे

१४) व्यवस्थापक, मंत्रालय उपाहारगृह/विधानभवन उपाहारगृह/कोकण भवन उपाहारगृह

१५) निवडनस्ती.